**पायाभूत प्रशिक्षण वर्गामध्ये विपश्यना प्रशिक्षणाचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्र.यशदा-२०११/६४५/प्र.क्र.१३४/११/१२-अ
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
दिनांक : ५ जुलै, २०११

वाचा : वित्त विभाग शासन निर्णय क्र.अरजा-२४०२/२७/सेवा-८, दि.२७.६.२००३

**परिपत्रक :**

शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना विपश्यना रिसर्च इन्स्टियुट, धम्मगिरी, इगतपूरी, जि. नाशिक या संस्थेमार्फत आयोजित करण्यात येणा-या विपश्यना शिबिरात भाग घेण्यासाठी वरील संदर्भाधिन शासन निर्णयान्वये काही सवलती अनुज्ञेय ठरविण्यात आल्या आहेत.

२ शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना शासन सेवेतील कामकाजात येणाऱ्या ताण-तणावातून मुक्तता मिळण्यासाठी त्यांना विपश्यना प्रशिक्षण अवगत असणे अत्यावश्यक असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे यशदा व अन्य प्रशिक्षण संस्था यांनी त्यांच्याकडील सर्व संवर्गाच्या पायाभूत प्रशिक्षण वर्गामध्ये विपश्यना प्रशिक्षणाचा समावेश करावा असे आदेश या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

३ सर्व मंत्रालयीन विभागांनी सदर परिपत्रक त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख तसेच संबंधित प्रशिक्षण संस्थांच्या निदर्शनास आणावे व त्यांना त्यानुसार कार्यवाही सत्वर करण्याबाबत कळवावे.

४ सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७०५१०३७४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**( रत्नाकर गायकवाड)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्री यांचे सचिव / उप मुख्य मंत्री यांचे सचिव
शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
मुख्य सचिव यांचे कार्यालय
महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
निवडनस्ती.

E:\My Document\Training/Vipashana Vipashana Training G.R..lwp